**व्यवसाय कराचे राज्य शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरण करण्यासाठी गुजरात राज्याने अवलंबिलेल्या प्रतिमानाचा /पद्धतीचा अभ्यास करण्यासाठी समिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- व्यकर-२०२५/प्र.क्र.११/कराधान-३.**

५वा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २८ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना** :- व्यवसाय कर हा राज्य शासनासाठी महसुलाचा एक महत्त्वाचा स्त्रोत असून विविध व्यवसाय, व्यापार, नोकरी आणि रोजगारांमध्ये गुंतलेल्या व्यक्तींकडून तो वसूल केला जातो. व्यवसाय कराचे प्रशासन आणि संकलन वस्तू आणि सेवा कर विभागामार्फत केले जाते.

तथापि, राज्यातील वाढते नागरिकीकरण आणि त्यायोगे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या जबाबदाऱ्या वाढत आहेत. वाढत्या जबाबदाऱ्या पार पाडण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या मर्यादित महसूल स्त्रोतामध्ये वाढ होणे आवश्यक आहे. त्यांना अतिरिक्त महसूल स्त्रोतांसह सक्षम केल्यास त्यांची आर्थिक स्थिरता वाढेल. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना व्यवसाय कर मिळाल्यास त्यांच्या उत्पन्नात वाढ होऊन स्थानिक विकास कामांना अधिक निधी मिळेल. यामुळे स्थानिक प्रशासन अधिक सक्षम होईल. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा स्थानिक पातळीवर व्यावसायिक आणि व्यवसायांशी थेट संबंध असल्याने कर संकलन अधिक प्रभाविपणे करता येईल. यानुषंगाने चौथ्या व पाचव्या राज्य वित्त आयोगाने देखील व्यवसाय कराचे स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतर करण्याची शिफारस केलेली आहे. वस्तूत: काही राज्य, जसे तामिळनाडू, गुजरात आणि केरळ यांनी व्यावसायिक कराचे संकलन नागरी स्थानिक संस्था आणि पंचायत राज संस्था या दोघांकडे हस्तांतरीत केलेले आहे.

नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना आर्थिकदृष्ट्या अधिक सक्षम करावयाचे असल्यास व्यवसाय कराचे राज्य शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरण करणे आवश्यक आहे. त्यामुळे या हस्तांतरणाबाबतचा सखोल अभ्यास करणे गरजेचे आहे. त्यासाठी ज्या राज्यांनी व्यवसाय कराचे हस्तांतरण स्थानिक स्वराज्य संस्थांकडे केलेले आहे, ते कशा प्रकारे केलेले आहे, कोणत्या पद्धतीचा अवलंब केलेला आहे व त्याचा काय परिणाम स्थानिक स्वराज्य संस्थांवर झालेला आहे, तसेच व्यावसायिकांना व्यवसाय कर भरण्यास स्थानिक स्वराज्य संस्थांनी कसे सक्षम केलेले आहे, याचा सविस्तर अभ्यास करणे आवश्यक आहे. यानुषंगाने इतर राज्यांनी व्यवसाय कराचे हस्तांतरण राज्य शासनाकडून स्थानिक स्वराज्य संस्थांकडे कसे केले, याचा अभ्यास करण्यासाठी समिती स्थापन

करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** राज्यातील व्यवसाय कराचे राज्य शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरण करण्यासाठी गुजरात राज्याने अवलंबिलेल्या प्रतिमानाचा /पद्धतीचा अभ्यास करण्याबाबत खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **सदस्य** | **पदनाम** |
|---|---|---|
| **१** | अपर आयुक्त, (मुख्यालय-५), राज्य कर विभाग. | अध्यक्ष |
| **२** | उप सचिव (कराधान), वित्त विभाग, मंत्रालय. | सदस्य |
| **३** | सह आयुक्त, (मुख्यालय-१), राज्य कर विभाग. | सदस्य |
| **४** | सह आयुक्त (व्यवसाय कर), राज्यकर विभाग. | सदस्य |
| **५** | उप आयुक्त, , (मुख्यालय-१), राज्य कर विभाग. | सदस्य |
| **६** | उप आयुक्त (व्यवसाय कर), राज्यकर विभाग. | सदस्य |

**२. समितीची कार्यकक्षा** :-

i) व्यवसाय कराचे राज्य शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरण करताना गुजरात राज्याने स्विकारलेल्या कायदेशीर चौकटीचे (**Legal Framework**) व त्यानुषंगाने हस्तांतरण सुलभ करण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या व्यवसाय कर कायद्यात केलेल्या सुधारणांचे परिक्षण करणे.

ii) व्यावसायिकांना नोंदणी व व्यवसाय कर भरणा करण्यास सक्षम करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी लागू केलेल्या तांत्रिक बाबींचे (**IT Systems /Online Payment /App**) परिक्षण करणे.

iii) व्यवसाय कराचे शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे संक्रमणासाठी (**Transition**) अवलंबलेल्या पद्धतीचा अभ्यास करणे.

iv) व्यवसाय कराचे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरणाशी संबंधित इतर कोणतीही संबंधित बाब.

**३.** सदर समिती गुजरात राज्याने व्यवसाय कराचे राज्य शासनाकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरण करण्यासाठी अवलंबिलेल्या प्रतिमानाचा /पद्धतीचा अभ्यास करुन आपला अहवाल शासनास वीस दिवसात सादर करेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या [www.maharashtra.gov.in](http://www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२८१५३९०४७६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANDAR ASHOK KELKAR

Digitally signed by MANDAR ASHOK KELKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=500b03a2acf8670cbc3af82871445df8c6c5862fbed7679822233103ec4e8926, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DC44279B721C6B725B0DB2B28A9A9ACEB0719B69B051F7861850C8129F723861, cn=MANDAR ASHOK KELKAR
Date: 2025.04.28 15:40:31 +05'30'

**( मंदार केळकर )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद /विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानपरिषद /विधानसभा सदस्य.
८. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. सचिव (वित्तीय सुधारणा) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. मा. राज्यकर आयुक्त, वस्तु व सेवा कर विभाग, माझगाव, मुंबई.
१२. निवडनस्ती (कराधान-३).